मुख्य विद्युत निरीक्षक व त्यांच्या अखत्यारितील इतर अधिकारी वर्गास वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण -२०१४/प्र.क्र. ५८८/ऊर्जा-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ८ मे, २०१५.

**संदर्भ** :-१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७/४/२०१५
२) प्रभारी मुख्य विद्युत निरीक्षक यांचे कार्यालयाचे पत्र क्र.मुविनिमुं/ कक्ष-१/०९/२०१५, दि.२४/४/२०१५

**प्रस्तावना :-**

उद्योग,ऊर्जा व कामगार विभागाच्या, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१४/प्र.क्र.५८८/ऊर्जा-२ दिनांक २६/०२/२०१५ अन्वये विद्युत निरीक्षणालय ऊर्जा विभागाच्या कार्यकक्षेत आणण्यात आले आहे. तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१४/प्र.क्र.५८८(१)/ ऊर्जा-२, दि.२४/४/२०१५ अन्वये विद्युत निरीक्षणालयाचे कामकाज सुरळीतपणे पार पाडण्यासाठी तातडीने करण्यात आलेल्या उपाययोजनेद्वारे मुख्य विद्युत निरीक्षक व अन्य कार्यालये ऊर्जा विभागाच्या प्रत्यक्ष अंमलाखाली आणण्यात आली आहेत. सदर कार्यालयांना विभाग प्रमुख / प्रादेशिक विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख म्हणून घोषित करण्याची व त्यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे .

**शासन निर्णय :-**

ऊर्जा विभागाअंतर्गत कार्यरत असलेल्या विद्युत निरीक्षणालय शाखेतील अधिकाऱ्यांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-१, मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत नियम क्र.२ अन्वये खालीलप्रमाणे वित्तीय अधिकार प्रदान करण्यात येत आहेत :-

१) अधिक्षक अभियंता, मुंबई प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मुंबई तथा प्रभारी मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांना "विभाग प्रमुख" तथा "नियंत्रक अधिकारी" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२) अधिक्षक अभियंता, मुंबई, पुणे,औरंगाबाद व नागपूर, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना "प्रादेशिक विभाग प्रमुख" तथा "नियंत्रक अधिकारी" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३) विद्युत निरीक्षक,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मुंबई, सांताक्रुझ, ठाणे-१, ठाणे-२, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, पुणे, सातारा, सोलापूर, कोल्हापूर, मिरज, नाशिक, अहमदनगर, धूळे,

नंदूरबार, जळगांव, औरंगाबाद, बीड, जालना, परभणी, हिंगोली, नांदेड, लातूर, उस्मानाबाद, अमरावती, अकोला, वाशिम, बुलढाणा, यवतमाळ, नागपूर, वर्धा, चंद्रपूर, गडचिरोली, भंडारा, गोंदिया, तसेच विद्युत निरीक्षक (उद्दवाहन, मुंबई) व विद्युत निरीक्षक (सचिव, अनुज्ञापक मंडळ व उद्दवाहन निरीक्षक) यांना "कार्यालय प्रमुख" तथा "नियंत्रक अधिकारी" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय,वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम/भाग-२, दि.१७/४/२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०५०८१८०४४१९९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

INAMDAR SIRAJ MANJAMIYA

Digitally signed by INAMDAR SIRAJ MANJAMIYA
DN: CN = INAMDAR SIRAJ MANJAMIYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = INDUSTRY ENERGY AND LABOUR,CID - 918056
Date: 2015.05.08 18:05:41 +05'30'

**(सि.मं.इनामदार)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत,**

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

मा. मंत्री(ऊर्जा) यांचे खाजगी सचिव

मा.मंत्री (सा.बां.वि.) यांचे खाजगी सचिव

मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद,विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.

अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

प्रधान सचिव (सा.प्र.वि.), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

प्रभारी मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, चेंबूर, मुंबई.

सर्व विभागीय आयुक्त

सर्व जिल्हाधिकारी

अधिक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर

महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर

सर्व विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

सर्व जिल्हाकोषाधिकारी

मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई

अवर सचिव (रोखशाखा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

कक्ष अधिकारी, (प्रशासन-२), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प/व्यय-१६/कोषागारे ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

निवड नस्ती (ऊर्जा-२), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.